# जॉर्ज मोझेस हॉर्टनची विलक्षण कहाणी

## कवी

लेखन व चित्रे: डॉन टेट

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



जॉर्जचे शब्दांवर खूप प्रेम होते. पण तो एक गुलाम होता. त्याचा बराचसा वेळ मालकाकडे राबण्यात जात असे. तो ना शाळेत जाऊ शकत होता, ना वाचायला शिकू शकत होता.

पण जॉर्जने वाचायला शिकायचेच, असा ठाम निश्चय केला. गोऱ्या मुलांचे धडे ऐकून तो अक्षरे शिकला. त्याने स्वत:च स्वत:ला वाचायला शिकवले. मिळेल ते लिखाण तो वाचू लागला.

जॉर्जला सगळ्यात जास्त आवडायची कविता. तो आपल्या मालकाच्या जनावरांची देखभाल करता करता कविता रचायचा. नजिकच्या कॉलेजच्या आवारात फळे, भाज्या विकायला जाताना तो आपल्या कविता गुणगुणत राहायचा. काही काळाने, कॉलेजच्या विद्यार्थ्यांमध्ये या गुलाम कवीची बातमी पसरली. मग जॉर्जला कविता ऐकणारे गिऱ्हाईक मिळू लागले.

पण जॉर्ज होता तर एक गुलामच! तो कधी स्वतंत्र होणार होता का?

हे पुस्तक जॉर्ज मोझेस हॉर्टनचे उत्कृष्ट चरित्र आहे. तो अमेरिकेच्या दक्षिण भागाचा पहिला आफ्रिकी-अमेरिकी कवी होता, ज्याच्या कविता प्रकाशित झाल्या. प्रसिद्ध लेखक, चित्रकार डॉन टेट यांनी प्रतिभावंत आणि दृढ अशा या कवीची ही स्फूर्तीदायक कहाणी सादर केली आहे.

शब्दांवर प्रेम करणारी माझी प्रिय आई शेरॉन टेट आणि माझी नातवंडे चार्ल्स, कॉर्डेल, अनिया आणि झुई यांना अर्पण

# जॉर्ज मोझेस हॉर्टनची विलक्षण कहाणी

## कवी

लेखन व चित्रे: डॉन टेट
मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



Make a joyful noise...

...unto the LORD

जॉर्जचे शब्दांवर खूप प्रेम होते. त्याला वाचायला शिकायचे होते. पण तो एक गुलाम होता. तो आपल्या कुटुंबासोबत *नॉर्थ कॅरोलिना* राज्यातील *चॅटहॅम* प्रांतात राहात असे. तिथे त्याच्याकडून अतोनात कष्ट करवून घेतले जात असे. त्यामुळे इतर काही करण्याची शक्तिच त्याच्यात उरत नसे. कुणी गुलाम वाचायला शिकत आहे, हे त्याच्या मालकांना अजिबात खपत नसे.

तरीही सभोवती ऐकायला मिळत असलेल्या भाषेच्या सौंदर्याने जॉर्ज भारावून जात असे. त्यात कधी बायबलचे स्फूर्तीदायक शब्द असत, पाद्र्याच्या प्रवचनातील आशादायी शब्द असत किंवा गीतातील उत्साह वाढवणारे शब्द असत.



जॉर्जने वाचायला शिकायचे अगदी पक्के ठरवले. गोरी मुले आपली पुस्तके वाचत तेव्हा जॉर्ज त्यांच्या आजुबाजुला घुटमळत असे. ती मुले वर्णमालेतील अक्षरे घोकत तेव्हा जॉर्ज लक्षपूर्वक ऐकत असे.

लवकरच जॉर्जला संपूर्ण वर्णमाला मुखोद्गत झाली.



जॉर्जच्या आईला त्याची मदत करावीशी वाटे. पण तिला ते शक्य होत नसे. मग तिने जॉर्जला आपल्याकडची एक अत्यंत मौल्यवान गोष्ट दिली. ते होते एक पुस्तक, *वेस्लीची भजने.*

जॉर्जचे हाती आलेले हे पहिलेच पुस्तक होते! तो त्याची पाने उलटून-पालटून अक्षरांचा वेध घ्यायचा प्रयत्न करू लागला. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. तो एकही शब्द वाचू शकला नाही.

एकदा जॉर्जला शब्दलेखनाचे एक जुने पुस्तक सापडले. ते फाटलेले होते, त्याची काही पाने गहाळ झाली होती. पण या पुस्तकापासूनच त्याने अक्षरे शिकायला सुरुवात केली.

जॉर्जने हे पुस्तक चाळले. यांतील काही अक्षरे तो ओळखू लागला.

दिवसभर राबल्यावर जॉर्जला रात्री विश्रांतीची गरज असे. पण तो शेकोटीच्या उजेडात अभ्यास करत बसे, डोळे धुराने चुरचुरू लागले तरीही!

लवकरच, त्याला काही शब्द समजू लागले. मग संपूर्ण वाक्याचे वाचन शिकायला त्याला फारसा वेळ लागला नाही. हळूहळू जॉर्जने स्वत:ला वाचायला शिकवलेच.



आता जॉर्जला शब्द आणखी आवडू लागले. तो शब्द नुसतेच वाचू शकत नव्हता, तर ते समजूनही घेऊ शकत होता. तो *नवा करार (बायबल)* मधील काव्य वाचू लागला. पुस्तके, वृत्तपत्रे, जाहिराती असे मिळेल ते साहित्य तो वाचू लागला.

पण त्याला सर्वात जास्त आवडायची, कविता.






सकाळी तांबडं फुटल्यापासून रात्री उशीरापर्यंत जॉर्ज आपल्या मालकाच्या शेतात जनावरांची देखभाल करत असे. काम करताना तो मनातल्या मनात कविता रचू लागला, त्यांना चालीही देऊ लागला. लिहायला शिकला नव्हता, म्हणून तो कविता पाठ करू लागला. तो शब्द आणि चाल आपल्या मेंदुच्या कप्प्यात साठवून ठेवू लागला.

त्याच्या कविता भावनांनी ओतप्रोत भरलेल्या असत, रविवारच्या चर्चच्या प्रार्थनेसारखी. जॉर्ज मोठा होऊ लागला तसे त्याच्या कविता त्याला ताकद देत राहिल्या.



जॉर्ज सतरा वर्षांचा झाला तेव्हा त्याच्या मालकांनी आपल्या मालमत्तेची वाटणी केली. आपली जमीन, जनावरे, घोडागाड्या, अवजारे त्याने आपल्या कुटंबियांमध्ये वाटले. गुलाम हे सुद्धा मालमत्ता समजले जात. त्यामुळे त्यांचीही वाटणी झाली. यामुळे जॉर्जची आपल्या कुटुंबियांशी ताटातूट झाली.

मालकाने जॉर्जला आपल्या मुलाला दिले. आता आपल्याला आपली आई, भावंडे कधीच भेटणार नाहीत, याचे जॉर्जला भय वाटू लागले.



जॉर्ज आपल्या नव्या मालकाच्या शेतात राबू लागला. काम बरेच कष्टाचे होते, पण दर रविवारी त्याला काही क्षण आरामाचे मिळत. त्या दिवशी जॉर्ज आठ मैल पायी चालून *चॅपल हील* नावाच्या एका गावी जात असे. तेथील नॉर्थ कॅरोलिना विद्यापीठाच्या परिसरात तो विद्यार्थ्यांना मालकाच्या शेतातील फळे आणि भाज्या विकत असे.

इतक्या दूर पायी चालत जाण्यात त्याला काही हरकत नव्हती. मालकाच्या शेतातून काही काळ सुटका झाल्यागत त्याला वाटत असे.

सुरुवातीला कॉलेजचे विद्यार्थी त्याला छेडत, त्याची चेष्टा करत. त्यांच्या अपमानाकडे दुर्लक्ष करण्यासाठी जॉर्ज आपल्या कविता म्हणत असे. त्याच्या हातगाडीवरील गोड फळांसारखे मधुर शब्द जॉर्जच्या ओठांतून पाझरू लागत.

जॉर्जच्या सुरेल कविता ऐकून सगळ्यांचे डोळे आश्चर्याने मोठे होत आणि त्यांच्या तोंडाचा आ वासत असे. या कविता जॉर्जनेच रचल्या आहेत, हे विद्यार्थ्यांना कळले तेव्हा तर ते थक्कच झाले.



या गुलाम कवीची बातमी वेगाने वाहाणाऱ्या नदीसारखी विद्यापीठाच्या परिसरात पसरली. त्याच्या कविता ऐकण्यासाठी विद्यार्थ्यांच्या झुंडीच्या झुंडी तिथे येऊ लागल्या.

त्यांतील काही विद्यार्थ्यांनी जॉर्जला मदत करायचे ठरवले. त्यांनी त्याला आपली इंग्रजी व्याकरण, शब्दकोश, इतिहास, भाषणकला, साहित्य, काव्य इत्यादी विषयांची पुस्तके दिली.

स्पंज पाणी शोषतो तसे जॉर्जने हे नवे विषय शिकून घेतले.





एकदा एका विद्यार्थ्याने आपल्या प्रेयसीसाठी एक कविता लिहिण्याची विनंती जॉर्जला केली. जॉर्जने थोड्याच वेळात तशी कविता रचली. त्याने त्या विद्यार्थ्याला कविता ऐकवली आणि सुवाच्य अक्षरात कागदावर लिहूनही काढली.

विद्यार्थ्याची प्रेयसी ती कविता वाचून भारावून गेली.

यानंतर इतर विद्यार्थीही जॉर्जकडे कविता लिहून मागू लागले. या कवितांचा मोबदला म्हणून ते जॉर्जला पैसे द्यायला तयार होते.



जॉर्ज आठवड्याभरात डझनभर कविता रचू लागला आणि प्रत्येक कविता पंचवीस सेंट किंमतीला विकू लागला. काही विद्यार्थी पैशांऐवजी त्याला छान कपडे आणि बूट देत. आता जॉर्जच्या अंगावर विद्यार्थ्यांसारखे सुंदर सुंदर कपडे दिसू लागले.

पैसे, सुंदर कपडे आणि आपला नवा दर्जा यांमुळे जॉर्जला मुक्त मुक्त वाटू लागले. अशी भावना त्याच्या मनात यापूर्वी कधी निर्माण झाली नव्हती.



पण जॉर्ज स्वतंत्र नव्हता. तो त्याच्या मालकाची मालमत्ता होता. तो अजूनही आठवडाभर शेतात राबत असे आणि रविवारी चॅपल हीलला जात असे.

या गुलाम कवीची कहाणी एका प्राध्यापक पत्नीने ऐकली. तिचे नाव *कॅरोलाइन ली हेन्त्झ*. ती स्वत: एक व्यावसायिक लेखिका आणि प्रसिद्ध कवयित्री होती. ती जॉर्जच्या कवितांनी भारावून गेली. जॉर्जच्या काही कवितांनी तिच्या चेहऱ्यावर स्मित फुलवले, तर इतर काही कवितांनी तिला चक्क रडवले.

जॉर्जला भेटून तिने त्याला त्याच्या कविता स्वत: कागदावर लिहायल्या शिकवले. इतकी वर्षे मुखोद्गत असलेल्या कविता आता जॉर्ज लिहायलाही लागला.



कॅरालाइनने मॅसेच्युसेट्स राज्यातील आपल्या *लॅंकेस्टर* शहराच्या वृत्तपत्रात जॉर्जच्या काही कविता छापून आणण्याची व्यवस्था केली. मग जॉर्ज एक प्रसिद्ध कवी बनला.

त्याने आपल्या कवितांमध्ये गुलामगिरीला विरोध व्यक्त केला होता. इतर कुणा अमेरिकी गुलामाने तोवर असा विरोधी स्वर काढला नव्हता.

लवकरच जॉर्जच्या रचना इतरही वृत्तपत्रांत प्रकाशित झाल्या. यात *फ्रिडम जर्नल* नावाचे वृत्तपत्रही होते. हे देशाचे पहिले असे वृत्तपत्र होते ज्याचा मालक एक आफ्रिकी-अमेरिकी व्यक्ती होता.

जॉर्जला स्वत:चा अभिमान वाटला. त्याचा आनंद गगनात मावेना.



आपले लेखन आणि इतर काही कामे यांतून जॉर्जला काही मिळकत होऊ लागली. त्याने मालकाला काही मोबदला देऊन स्वत:साठी वेळ मागून घेतला. मग तो चॅपल हीलमध्ये राहू लागला आणि कविता रचण्यात मग्न झाला. आपल्या मालकाशी त्याने जो करार केला तो अधिकृत नव्हता, पण त्याच्या मालकाने त्याची पर्वा केली नाही.

आता जॉर्ज पूर्णवेळ लेखक बनला. पण अजूनही तो स्वतंत्र नव्हता.

काही काळानंतर, जॉर्जचे पहिले पुस्तक *द होप ऑफ लिबर्टी (मुक्तीची आशा)* प्रकाशित झाली. जॉर्जला आपल्या कमाईतून स्वातंत्र्य खरेदी करायचे होते.

फ्रिडम जर्नलच्या संपादकांना त्याच्या योजनेची कुणकुण लागली तेव्हा त्यांनी जॉर्जच्या मदतीसाठी निधी जमवण्याचा प्रयत्न केला. अनेक प्रसिद्ध व्यक्ती या मोहिमेत सहभागी झाल्या. यात पत्रकार होते, कॉलेजचे अध्यक्ष होते, गव्हर्नर होते. सगळ्यांनी बराच पैसा देण्याची हमी दिली, पण जॉर्जचा मालक आपला हा मौल्यवान गुलाम विकण्यास तयार झाला नाही.





जॉर्ज निराश झाला.

या दरम्यान, उत्तर भागातील सुधारणावादी लोक गुलामगिरी प्रथा समाप्त करण्याच्या कामी गुंतले होते. त्यांनी पुस्तके प्रसिद्ध केली, भित्तीपत्रे, पत्रिका छापले. त्यांनी दक्षिण भागातील गुलामांना मालकाविरुद्ध आवाज उठवण्याचे आवाहन केले. जे गुलाम वाचू शकत होते, त्यांना हा संदेश इतर गुलामांपर्यंत पोहोचवला.





परिणामी, अनेक गुलामांनी विरोधाचा सूर उठवला. काहींनी आपल्या मालकाची हत्याही केली. संपूर्ण दक्षिण भागात भयाचे वातावरण पसरले.

नॉर्थ कॅरोलिना भागात नवे कडक कायदे लागू करण्यात आले. ज्या लोकांनी गुलामगिरी प्रथेच्या विरोधी साहित्य छापले, त्यांना शिक्षा सुनावण्यात आल्या. पण सर्वात वाईट गोष्ट म्हणजे, गुलामाला लिहा-वाचायला शिकवणे हा गुन्हा ठरवण्यात आला.



आता गुलामगिरीविरोधी कविता लिहिणे, जॉर्जसाठी धोकादायक बनले.

पण त्याने लिखाण पूर्णपणे बंद केले नाही. त्याचे दुसरे पुस्तक प्रकाशित झाले, *द पॉलिटिकल वर्क्स ऑफ जॉर्ज एम्. हॉर्टन.* यात जीवन, प्रेम, मृत्यू आणि मैत्री या विषयांशी संबंधित कविता होत्या.

1861 साली, उत्तर भाग आणि दक्षिण भाग यांच्यात गृहयुद्ध सुरू झाले. युद्धाचे कारण होते, गुलामगिरी प्रथा. बहुतांशी विद्यार्थी दक्षिण भागाच्या बाजुने लढू लागले.

चॅपल हील विद्यापीठाच्या परिसरात जॉर्जच्या कवितांचे खरेदीदार एवढे कमी झाले की तो आपल्या मालकाला मुक्त वेळ मिळण्यासाठी पैसे देऊ शकला नाही. त्यामुळे त्याला मालकाच्या शेतात मजुरी करण्यास परतावे लागले.



गृहयुद्ध चार वर्षे चालले. 1863 मध्ये, राष्ट्राध्यक्ष *अब्राहम लिंकन* यांनी गुलामांच्या मुक्तीच्या जाहीरनाम्यावर स्वाक्षरी केली आणि आपल्या राष्ट्राला एक नवी दिशा दिली.

अखेरीस वयाच्या सहासष्टाव्या वर्षी जॉर्ज खऱ्या अर्थाने मुक्त झाला.

स्वतंत्र झाल्यावर त्याला मालकाच्या शेतात राबण्याची गरज उरली नाही. वसंत ऋतूत आपली लेखणी आणि कागद घेऊन तो प्रवासाला निघाला.

केंद्रीय सैन्यासह तो पश्चिमेकडे चालू लागला, अध्येमध्ये थांबत, आराम करत. त्याने या प्रवासावर, आपल्या कुटुंबावर, मित्रांवर आणि आपल्या दीर्घायुष्यातील विविध अनुभवांवर कविता रचल्या.






जॉर्जचे शब्दांवरील प्रेम त्याला एका महान सफरीवर घेऊन गेले. शब्दांनी त्याला कणखर बनवले. शब्दांनी त्याला स्वप्ने बघायची मुभा दिली. गुलामगिरीच्या शेवटच्या दिवसाआधीच त्याचे गुलामीचे बंध या शब्दांनी सैल केले होते.

हे पुस्तक लिहिण्यासाठी मी शोधकाम करत होतो, तेव्हा मला पुढील पुस्तकांची आणि संकेतस्थळांची खूप मदत झाली. - डी.टी.

हॉर्टन, जॉर्ज मोझेस. *नेकेड जीनियस*, चॅपल हील, एन सी: द चॅपल हील हिस्टॉरिकल सोसायटी, 1982

हॉर्टन, जॉर्ज मोझेस. *द पॉलिटिकल वर्क्स ऑफ जॉर्ज एम्. हॉर्टन, द कलर्ड बार्ड ऑफ नॉर्थ कॅरोलिना, टु विच इज प्रीफिक्स्ड द लाइफ ऑफ द ऑथर, रिटन बाय हिमसेल्फ, जॉर्ज हॉर्टन,* हिल्सबरो, एनसीडी हार्ट, 1845.

हे पुस्तक चॅपल हील येथील नॉर्थ कॅरोलिना विद्यापीठाचे संकेतस्थळ *डॉक्युमेंटिंग द साउथ* यावरून निःशुल्क डाउनलोड करता येते.

शर्मन, जोन आर (संपादीत). द ब्लॅकबार्ड ऑफ नॉर्थ कॅरोलिना: जॉर्ज मोझेस हॉर्टन अॅण्डहिज पोएट्री. चॅपल हील, एनसी: द युनिव्हर्सिटी ऑफ  नॉर्थ कॅरोलिना प्रेस, 1997.

वॉल्सर, रिचर्ड. *द ब्लॅक पोएट: बींग द रिमार्केबल स्टोरी (पार्टली टोल्ड बाय माय (एवमेव) हिमसेल्फ) ऑफ जॉर्ज मोझेस हॉर्टन, अ नॉर्थ कॅरोलिना स्लेव.* न्यू यॉर्क: फिलोसॉफिकल लायब्ररी इन्कॉरपोरेटेड, 1966.

वॉल्सर, रिचर्ड आणि जूलिया, मोंटोगोमरी स्ट्रीट. *नॉर्थ कॅरोलिना परेडस्: स्टोरीस् ऑफ हिस्ट्री अॅण्ड पीपल.* चॅपल हील, एनसी: द युनिव्हर्सिटी ऑफ नॉर्थ कॅरोलिना प्रेस, 1966.

विल्यम्स्, हेदर आंद्रिया. *सेल्फ टॉट: आफ्रिकन अमेरिकन एज्युकेशन इन स्लेवरी अॅण्ड फ्रीडम.* चॅपल हील, एनसी: द युनिव्हर्सिटी ऑफ नॉर्थ कॅरोलिना प्रेस, 2005.

*द नॉर्थ कॅरोलिना स्टोरी: अ व्हर्च्युअल म्यूझियम ऑफ युनिव्हर्सिटी हिस्ट्री*, द युनिव्हर्सिटी ऑफ नॉर्थ कॅरोलिना *अॅट* चॅपल हील.

जॉर्ज मोझेस हॉर्टनच्या अनेक कवितांतील अवतरणांचा उपयोग या पुस्तकातील चित्रांमध्ये केलेला आहे. त्यांच्या कविता लोकांना सहज उपलब्ध आहेत. तुम्ही त्या ऑनलाईन शोधू शकता.

# लेखकाचे मनोगत

मी मुलांच्या पुस्तकांसाठी चित्रं काढू लागलो तेव्हा मी ठरवलं होतं की गुलामगिरी विषयावर लिहिलेल्या पुस्तकांचे काम करायचं नाही. या निर्णयाला काही कारणं होती. यांतील एक कारण होतं, मला आजच्या तरुणाईचं लक्ष वर्तमानातल्या समस्यांवर केंद्रीत करायचं होतं. पण खरं कारण सांगायचं तर गुलामगिरी हा विषय माझ्या मनात शरमेची भावना उत्पन्न करत असे.

मी मध्यपश्चिमी क्षेत्रात एका छोट्याशा शहरात 1970 आणि 80 च्या दशकात वाढलो. मी गोऱ्या चेहऱ्यांच्या विशाल समुद्रात तपकिरी वर्णाचा एकमेव चेहरा होतो. मला वाटायचं की काळ्या वर्णाच्या लोकांचा इतिहास म्हणजे गुलामगिरीची कहाणी. एके काळी काळे लोक गोऱ्या लोकांची मालमत्ता असत. त्यांना घोडा वा हातगाडीएवढीच किंमत असे. अनेकदा गोरी मुलं त्यांची चेष्टा करत. कधी कधीतर काळी मुलंसुद्धा चेष्टा करत.

पण जसजशी माझी कारकीर्द घडत गेली, तसतसे गुलामगिरी विषयावरील लेखन माझ्याकडे येऊ लागलं. सुरुवातीला मी संकोच करायचो. पण त्या कहाण्या वाचल्यावर मला आमच्या लोकांचा इतिहास कळला आणि माझं मन बदललं. मी ठरवलं की यात लज्जास्पद काहीच नाही, उलट ही अभिमानाची बाब आहे.

मी या कहाण्यांमध्ये गुंतत चाललो. मला त्यात आफ्रिकी-अमेरिकी लोकांची विजिगिषु वृत्ती दिसली. मला हे कळत होतं की प्रकाशन उद्योग गुलामगिरी विषयावरील पुस्तकांसोबतच इतरही विषयांवरील पुस्तकं छापू शकतात. ज्या लोकांनी ही अमानुष प्रथा अनुभवली होती, त्यांच्या कहाण्या खरोखरच ऐकण्याजोग्या होत्या.

माझ्या एका लेखक मित्राने सुचवलं की मी जॉर्ज मोझेस हॉर्टनची कहाणी लिहावी. माझं कुतूहल चाळवलं. यासंबंधी शोध घेत असताना, मला जॉर्जची आत्मकथा *द लाइफ ऑफ द ऑथर रिटर्न बाय हिमसेल्फ* यामध्ये बरीच माहिती मिळाली. हे एक संक्षिप्त आणि प्रेरणादायी आत्मवृत्त आहे, ज्यामध्ये जॉर्जच्या आयुष्यातल्या प्रमुख घटना अंतर्भूत आहेत. पण याने माझ्या मनात असंख्य प्रश्न निर्माण झाले. ते मला सतत टोचत राहिले.

जॉर्ज मोझेस हॉर्टनने स्वत:ला वाचायला शिकवलं, कॉलेजच्या विद्यार्थ्यांना आपल्या कविता विकल्या, अनेक पुस्तकं प्रकाशित केली आणि हे सगळं अशा काळात जेव्हा आफ्रिकी-अमेरिकी लोकांचा आत्मविश्वास खच्ची केला जात असे. त्यांनी शिकणं हा गुन्हा ठरवला जात असे. मग जॉर्जने हे सगळं कसं काय आत्मसात केलं?

हॉर्टनच्या ध्येयप्राप्तीबाबत समजून घेण्यासाठी मला नॉर्थ कॅरोलिनाच्या गुलामगिरी प्रथेचा खास अभ्यास करावा लागला. दक्षिणेकडील इतर भागांपेक्षा येथील गुलामांची स्थिती वेगळी होती. नॉर्थ कॅरोलिनात स्वतंत्र झालेल्या गुलामांची संख्या सर्वात जास्त होती. येथील कित्येक लोक गुलामगिरी विरोधी संघटना आणि गुलामांच्या स्वातंत्र्याला समर्थन देत असत. येथील शेतं लहान आकाराची होती. असे लहान शेतमालक आपल्या गुलामांसोबत स्वत:ही आपल्या शेतात राबत असत. हे विचित्र वाटतं, पण अनेक गुलामांनाही ते आपल्या कुटुंबाचे सदस्य मानत. हॉर्टनला कदाचित अशा मोकळ्या वातावरणाचा लाभ मिळाला असावा.

ही गोष्ट वगळता, नॉर्थ कॅरोलिनातील गुलांमांचंही आयुष्य खडतरच होतं. ते दिवसभर विनावेतन अंगमेहनत करत. मालक त्यांना देत असलेलं अन्न फार कमी आणि वाईट दर्जाचं असे. अंगावर घालायला त्यांना पुरेसे कपडे नसत. मालकाच्या इच्छेनुसार, कुटुंबियांची ताटातूट होत असे. मालक गुलामांना कधीही विकत असत. मग गुलाम आपल्या कुटुंबियांना पुन्हा कधीच भेटू शकत नसत. जॉर्जसोबत हेच घडलं. अशा प्रतिकूल परिस्थितीत जॉर्जने केलेली प्रगती ही विलक्षण बाब होती.

1831 मध्ये, नजिकच्या व्हर्जिनिया राज्यात गुलामांचा विद्रोह झाला तेव्हा पंचावन्न गोऱ्या लोकांची हत्या झाली. या घटनेनंतर नॉर्थ कॅरोलिनाचा चेहरामोहरा बदलला. गुलामगिरी विरोधी लेखन वाचू शकणारे आणि इतरांना ते वाचून दाखवणारे गुलाम सरकारला धोकादायक वाटू लागले. नॉर्थ कॅरोलिनात एक नवा कायदा लागू करण्यात आला. याद्वारे कोणाही काळ्या वा गोऱ्या व्यक्तिने गुलामांना लिहा-वाचायला शिकवणं हा गुन्हा ठरवण्यात आला. हा कायदा तोडणाऱ्या गोऱ्या व्यक्तिंना दंड भरावा लागत असे आणि काळ्या लोकांना चाबकाचे एकोणचाळीस फटके दिले जात.

हा काळ हॉर्टनसाठी संकटांचा होता. कारण त्याच्या कवितांमध्ये गुलामगिरी विरोधी सूर होता. तरीही त्याने आपलं लिखाण सुरूच ठेवलं आणि आपलं दुसरं पुस्तक, *द पॉलिटिकल वर्क्स ऑफ जॉर्ज मोझेस हॉर्टन*, प्रकाशित केलं. पण त्यात त्याने गुलामगिरी, स्वातंत्र्य अशा गोष्टी घेतल्या नाहीत.

गृहयुद्ध समाप्त झाल्यावर, हॉर्टनला हवं असलेलं स्वातंत्र्य मिळालं. 1865 मध्ये, त्याने आपल्या कवितांचं तिसरं पुस्तक, *नेकेड जीनीअस*, प्रकाशित केलं. आयुष्याच्या अंतिम काळात जॉर्ज फिलाडेल्फियाला जाऊन राहिला. तिथे त्याने बायबलमधील कथांवर आधारित संक्षिप्त वर्णनं लिहिली. ती विविध मासिकांना आणि संडे स्कूलच्या नियतकालिकेला विकली. त्याचा मृत्यू 1883 साली झाला असावा. याबाबत निश्चित तारीख उपलब्ध नाही. तो कसा दिसत होता हेदेखील आपल्याला माहीत नाही. इंटरनेटवर त्याची अनेक चित्रं, पाहायला मिळतात, पण त्यांची अस्सलता पडताळून पाहाणं आवश्यक आहे.

हे पुस्तक लिहिताना माझा उद्देश हाच होता की मी गुलामगिरीचा विषय लोकांच्या मनापर्यंत पोहोचवेन. माझ्या वाचकांना जॉर्ज मोझेस हॉर्टनची ओळख व्हावी, हॉर्टनची त्यांच्या आयुष्यात काय उपयुक्तता आहे याची लोकांना जाणीव व्हावी.

हॉर्टनच्या काळात आफ्रिकी-अमेरिकी लोकांमध्ये फारशी साक्षरता नव्हती. आज त्यांच्या साक्षरतेचे प्रमाण खूप वाढलं आहे. आकडे स्पष्टपणे दर्शवतात की अनेक आफ्रिकी-अमेरिकी विद्यार्थी हायस्कूलचं शिक्षण घेऊनही बऱ्याचदा निरक्षरच राहातात. म्हणजे ते नीट लिहू-वाचू शकत नाहीत. आजही आमच्या लोकांमध्ये साक्षरता ही हॉर्टनच्या काळात होती तेवढीच मोठी समस्या आहे.

आशा आहे की तरूण वाचक जॉर्ज मोझेस हॉर्टनच्या कहाणीत स्वत:ला, एका प्रतिभावंत, स्वप्ने पाहाणाऱ्या, आशादायी व्यक्तिला पाहातील, ज्याला मुक्त होण्याची इच्छा आहे, अगदी हॉर्टनसारखीच.

## आभार

या पुस्तकाची शोधप्रक्रिया सुरू असताना मदत केलेल्या पुढील व्यक्तिंचे मी आभार मानतो:

*अर्ल एल. ईजेम्स,* संग्रहालय प्रमुख, नॉर्थ कॅरोलिना म्यूझियम ऑफ हिस्ट्री;

*मॅट कारकुट,* यूनिव्हर्सिटी लायब्ररी, यूनिव्हर्सिटी ऑफ नॉर्थ कॅरोलिना, चॅपल हील विल्सन लायब्ररी, यूनिव्हर्सिटी ऑफ नॉर्थ कॅरोलिना, चॅनल हील.

*ग्रेगरी टेलर,* माजी प्रमुख, हिस्टॉरिक होप प्लान्टेशन, विन्डसर, नॉर्थ कॅरोलिना.

आमच्या गुणी संपादक *कॅथी लँडवेयर* याचेही आभार. त्यांची तीक्ष्ण निरीक्षण शक्ती, हजरजबाबीपणा आणि मार्गदर्शन यामुळे पुस्तकाची निर्मिती प्रक्रिया आनंदाचा प्रवास ठरला.

ही कथा लिहायला प्रेरणा दिल्याबद्दल *ख्रिस बार्टन*चे आभार.

माझ्या समीक्षक *डॉना जनेल बोमेन* आणि *कार्मेन ऑलिव्हर* यांचे आभार.

माझ्या चित्रांचे समीक्षक *ख्रिस्तोफर एस. जेनिंग्ज, थॉमस युंग, एरिक कुन्त्झ, निक ऑल्टर* आणि *स्कॉट ड्युबॉय* यांचे आभार.

डॉन टेट





डॉन टेट

डॉन टेट यांनी मुलांच्या अनेक प्रसिद्ध पुस्तकांत चित्रे काढली आहेत. यात *द अमेझिंग एज ऑफ जॉन राय लिंच, द कार्ट दॅट कॅरीड मार्टीन* आणि *होप्स गिफ्टी* ही पुस्तकेही आहेत. 2013 मध्ये त्यांना *इट जस्ट हॅपन्ड: व्हेन बिल ट्रेलर स्टार्टेड टू ड्रॉ* या पुस्तकासाठी *एझरा किट्स न्यू रायटर पुरस्कार* मिळाला. ते टेक्सासमध्ये राहात असत.